जिल्हा रुग्णालय नाशिक येथे २००
खाटांच्या कक्षातील (अतिरिक्त काम)
बांधकामाच्या अंदाजपत्रकास
प्रशासकीय मान्यता देण्याबाबत

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
## शासन निर्णय, क्रमांकः प्रशामा २०१५/प्र.क्र. १३३/आरोग्य ३

१० वा मजला, संकुल इमारत,
जी.टी. रुग्णालय आवार, मुंबई - ४०० ००१.
दिनांक : १९ सप्टेंबर, २०१५.

**वाचा :**

१) **शासन निर्णय क्र.प्रशामा-२०१३/प्र.क्र.३७३/आरोग्य-३ दि. १६ सप्टेंबर, २०१३**
२) **आरोग्य सेवा संचालनालय यांचे पत्र क्रमांक : संआसे/कक्ष-३/टे-६/जिरुअतिकामबांध/३-२७२१-२२/१५, दिनांक २३.०३.२०१५.**

**प्रस्तावना :**

जिल्हा रुग्णालय नाशिक येथे २०० खाटांच्या कक्षातील (अतिरिक्त काम) बांधकामाच्या रुपये १,२०,४६,०००/- एवढ्या रकमेच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या मान्यतेसाठी दिनांक २३ मार्च, २०१५ रोजी संचालक, आरोग्य सेवा यांच्याकडून शासनास प्राप्त झाला आहे. सदर प्रस्तावास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

२. जिल्हा रुग्णालय नाशिक येथे २०० खाटांच्या कक्षातील (अतिरिक्त काम) बांधकामाचे अंदाजपत्रक सन २०१४-१५ च्या जिल्हा दरसूचीवर आधारित आहे. सदर कामाच्या अंदाजपत्रकातील आकस्मीक खर्चासाठी ४ टक्के व विद्युतीकरणाच्या खर्चासाठी ११ टक्के तरतूद योग्य करण्यात येऊन, खालील नमूद कामांना त्या खालील अटी व शर्तींच्या अधिन राहून रुपये १,१३,५५,०००/- (अक्षरी रुपये एक कोटी तेरा लक्ष पच्चावन हजार फक्त) इतक्या रकमेस या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे :-

| अ.क्र. | कामाचे नांव | अंदाजित किंमत (रुपये) |
|---|---|---|
| १ | रुग्णालयामध्ये फर्निचर व पार्टीशनचे काम | रु. ८३,४६,७५७.०० |
| २ | रेनवॉटर हार्वेस्टिंगचे काम | रु. ८,८८,११०.०० |
| ३ | प्लिंथ प्रोटेक्शनचे काम | रु. ६,३८,८९१.०० |
| ४ | **एकूण (१+२+३)** | **९८,७३,७५८.००** |
| ५ | कॉन्टेजेन्सी (४ टक्के) | ३९,४९५०.३२ |
| ६ | लाईट फिटींग (११ टक्के) | १०,८६,११३.३८ |
| | **एकूण (४+५+६)** | **रु. १,१३,५४,८२१.७०** |
| | **एकूण पूर्णांकात** | **रु. १,१३,५५,०००.००** |

**<u>अटी व शर्ती</u> :-**

१) कामासाठी निविदा मागविण्याआधी सदर कामास सार्वजनिक बांधकाम विभागातील सक्षम अधिकाऱ्यांची तांत्रिक मंजुरी घेणे आवश्यक राहील.

२) अंदाजपत्रकावर मुख्य अभियंता नाशिक यांचे स्वाक्षांकन घ्यावे.

३) कामासाठीच्या जागेची उपलब्धता, योग्यता व जागा पुरेशी आहे किंवा नाही याबाबतची खात्री संबंधित आरोग्य संस्था प्रमुखांनी करावी.

४) क्षेत्रिय जागेच्या परिस्थितीनुसार व आरोग्य संस्थांच्या आवश्यकतेनुसार प्रस्तावित कामाची किंमत वाढणे शक्य असल्यामुळे त्यासाठी आवश्यक प्रस्ताव सार्वजनिक बांधकाम विभागाच्या त्या-त्या भागाच्या क्षेत्रिय अधिकाऱ्यांकडून करुन घ्यावेत.

५) सदरचे अंदाजपत्रक हे ढोबळ नमुना अंदाजपत्रक असल्याने, या कामांच्या सविस्तर अंदाजपत्रकांना तांत्रिकदृष्ट्या मान्यता ही सार्वजनिक बांधकाम खात्याच्या त्या-त्या क्षेत्राच्या सक्षम अधिकाऱ्यांकडून करण्यात येईल. अशी तांत्रिक मान्यता करीत असताना आरोग्य खात्याच्या त्या-त्या आरोग्य सेवा मंडळाच्या उप संचालकांच्या सहमतीने तरतुदी अंतिम करण्यात याव्यात.

६) सदरचे काम नवीन नमुना नकाशांप्रमाणे करावयाचे झाल्यास सार्वजनिक आरोग्य विभागाने नियुक्त केलेल्या खाजगी वास्तुशास्त्रज्ञामार्फत नकाशांप्रमाणे वास्तुमांडणी आराखडा मंजूर करुन घेण्यात यावा. तसेच स्थानिक ग्रामीण नगर विकास संस्थेच्या संबंधित नियमानुसार बांधकाम परवानगी तसेच भोगवटा प्रमाणपत्र मिळविण्याची जबाबदारी सदर नवनियुक्त वास्तुशास्त्रज्ञ व जिल्हा शल्य चिकित्सक यांची राहील. तसेच ही परवानगी मागण्यासाठीचा पत्रव्यवहार जिल्हा शल्यचिकित्सक यांच्या स्वाक्षरीने करण्यात यावा.

७) सार्वजनिक बांधकाम विभागाच्या मुख्य/ उपमुख्य वास्तुशास्त्रज्ञाकडून या कामांच्या नकाशे व वास्तुमांडणी आराखड्यांना वेगळ्या मंजूरीची आवश्यकता नाही.

८) प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय, क्रमांक- इएनव्ही २०१३/प्र.क्र. १७७/ तां.क.१, दिनांक १०.०१.२०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वांनुसार कार्यवाही करण्यात यावी.

३. जिल्हा रुग्णालय नाशिक येथे २०० खाटांच्या कक्षातील (अतिरिक्त काम) बांधकामावरील खर्च मागणी क्रमांक- एच-८, मुख्यलेखाशिर्ष "४२१०- वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य सेवा यावरील भांडवली खर्च, ०१- नागरी आरोग्य सेवा (वैद्यकीय सहाय्य)- पंचवार्षिक योजनांतर्गत योजना- इमारती, ११०- रुग्णालये व दवाखाने, (१)(अ) पंचवार्षिक योजनांतर्गत योजना- इमारती, (००)(०१) मोठी बांधकामे (४२१० ००१४), ५३- मोठी बांधकामे" या खाली भागविण्यात यावा.

४. जिल्हा रुग्णालय नाशिक येथे २०० खाटांच्या कक्षातील (अतिरिक्त काम) बांधकामासाठी लागणाऱ्या रकमेची अर्थसंकल्पात तरतूद करण्याचा प्रस्ताव संचालक, आरोग्य सेवा, मुंबई यांनी त्वरीत शासनास सादर करावा.

५. हे आदेश शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक- विअप्र १०००/प्र.क्र. ४६/विनियम, दिनांक ११.७.२००१ सोबतच्या परिशिष्ट, भाग पहिला, उपविभाग-पाच मधील अनुक्रमांक-१, परिच्छेद क्रमांक-१३४ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये तसेच सार्वजनिक बांधकाम विभागाच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेताक २०१५०९१८१५३१३९७४१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Prakash Indalkar

Digitally signed by Prakash Indalkar
DN: CN = Prakash Indalkar, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Under Secretary
Date: 2015.09.19 12:52:35 +05'30'

**( प्रकाश इंदलकर )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत,

१. महालेखापाल, महाराष्ट्र- १/ २ (लेखा परिक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर.
२. संचालक, आरोग्य सेवा, मुंबई.
३. संनियंत्रक तथा मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, औरंगाबाद/ मुंबई.
४. सह संचालक, आरोग्य सेवा (रुग्णालये), मुंबई.
५. उप संचालक, आरोग्य सेवा मंडळ, नाशिक.
६. जिल्हा शल्य चिकित्सक, जिल्हा रुग्णालय,नाशिक.
७. वैद्यकीय अधिक्षक, जिल्हा रुग्णालय, नाशिक.
८. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, नाशिक.
९. उप अभियंता, सार्वजनिक बांधकाम उपविभाग, जि.नाशिक.
१०. जिल्हा कोषागार अधिकारी, जि.नाशिक.
११. सार्वजनिक बांधकाम विभाग (इमा-२), मंत्रालय, मुंबई.
१२. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. निवडनस्ती (आरोग्य-३).